ॐ श्रीगणेशाय नमः । भूशुण्डी म्हणे देवांसी । आतां सांगेन तुम्हांसी । भूषविती कमंडलुतटासी । त्यांतील मुख्य तीर्थांचें वर्णन ।।१।। मुख्य एक गणेशकुंड ख्यात । त्याचें चरित्र संक्षेपें सांगत । त्यानंतर पंचतीर्थांचा महिमा अद्भुत । सांगेन तुम्हांस अपूर्व ।।२।। मध्यभागीं गणेशतीर्थ असत। दोनशें धनुष्यें अंतर वर्तत । तेथ देव मुनिजन स्नान करित । नित्य प्रयत्नें तीर्थें हीं ।।३।। त्या उभयतांच्या तीरावर स्थित । तीर्थें ब्रह्मकमंडलूच्या ज्ञात । तेथ जे स्नान करित । ते प्राणी गाणेश होती ।।४।। त्यापुढती महातीर्थ कापिल असत । जेथ गणेश कपिल होत । कमलासुरनाशार्थ जगांत । मारिलें त्यानें त्या असुरासी ।।५।। ह्या असुरासी मारून । महावीर्य जो महान । शंकरादींच्या साहाय्यें करून । त्याचें मस्तक धारण करी ।।६।। कपिल गणेश मयूरक्षेत्रांत । तेथ ब्रह्मा अभिषेक करित । मुनिगणांच्या सान्निध्यांत । गणेशसूक्तें हर्षभरानें ।।७।। तेथ नद्यांच्या संगमें होत । पंचामृत नामें तीर्थ विख्यात । तेथ स्नान करितां लाभत । कापिल सांख्यात्मक ज्ञान ।।८।। कपिलरूप





विष्णु संस्थित । त्या स्थानीं तो पुनीत । त्यापुढतीं व्यासतीर्थ वर्तत । सर्व अज्ञानाचें विनाशक ।।९।। त्याच प्रमाणांत जाणावें । त्या तीर्थाचें क्षेत्र बरवें । व्यासें तप आचरिलें भक्तिभावें । तेथ शंभर वर्षे दारुण ।।१०।। तदनंतर देवेशांनो त्यास देत । गणेश्वर वर प्रकटून पुढ्यांत । त्यायोगें भारत रचित । धर्माधर्मयुक्त महान ।।११।। ब्रह्मप्रद शास्त्र तें ज्ञात । व्यास तत्त्वज्ञान ग्रथित । त्या व्यासतीर्थी स्नान करित । मुक्त जाड्यभावांतून तो ।।१२।। धर्माधर्म व्यवस्था जाणून । होईल त्या नरा बोधज्ञान । गणेशतीर्थाच्या पूर्वेकडे शोभन । भीमकुंड भीमेश निर्मित ।।१३।। भीमेशानें तेथ राहून । गणेशतप आचरिलें महान । प्रसन्न होतां गजानन । वरदान त्यास लाभलें ।।१४।। त्या वरदानप्रभावें मारित । भीमासुरासी त्वरित । भीमेश नाम तीर्थ मुख्यत्वें ज्ञात । महाऐश्वर्यप्रदायक ।।१५।। एकदा उन्हाळ्यांत जलहीन । तें भीमेशतीर्थ होत पावन । तीर्थयात्रेस्तव आगमन । भीमाचें तेथ जाहलें ।।१६।। तो पांडुपुत्र स्नानार्थ । गदाप्रहारें तीर्थ खोदित । तेव्हां जलधारा उसळत । स्नान करी त्यांत भक्तिभावें ।।१७।। बलात्मक ऐश्वर्य तयास प्राप्त । त्या तीर्थाच्या माहात्म्यें अद्भुत । पुढें तो धृतराष्ट्रसुतांस मारित । ऐश्वर्यें संयुत होऊनियां ।।१८।। त्यानंतर परम ऋषींस्तव होत । हें तीर्थ स्वधर्मप्रद प्रख्यात । त्याचा विस्तार इतर कुंडासम असत । महान असे हें कुंड ।।१९।। ऐंशी हजार मुनि आचरित । ब्रह्मप्राप्त्यर्थ तपें अविरत । त्यायोगें ते ब्रह्मभूत समस्त । जीवन्मुक्त जाहले ।।२०।। ते तेथ राहून भजत । लंबोदर देवासी भक्तियुक्त । पंचतीर्थीं असे प्रख्यात । ह्या मयूरक्षेत्रांत ।।२१।। त्या पांच तीर्थांत करितां स्नान । ब्रह्मभूत होतात जन । प्रथम गणेशतीर्थात स्नान । तदनंतर भैम तीर्थांत ।।२२।। तदनंतर आर्ष व्यासतीर्थांत । त्यापुढें कपिलतीर्थीं स्नान करित । अन्तीं पुनरपि गणेशतीर्थांत । स्नान करावें

हा क्रम असे ।।२३।। गणेशतीर्थाच्या पूर्वेस असत । एक उत्तम तीर्थ विस्तृत । छत्तीसशें धनुष्यें मर्यादा ख्यात । ह्या पापविनाशक क्षेत्राची ।।२४।। दक्षिणतीरीं शिव वसत । आपुल्या शक्तिसमन्वित । तेथ तीर्थाचा आश्रय घेत । सर्वार्थाचें प्रवर्तक जें ।।२५।। उत्तर तीरावर स्थित । केशव रमेच्या सान्निध्यांत । सर्वधर्मप्रदाता तो ज्ञात । क्षेत्रांतीं क्षेत्रधारक ।।२६।। तें सर्व पापनाशक ख्यात । सहावें तीर्थक्षेत्रांत । स्नान करितां नर होत । दुःखमुक्त प्रसन्न ।।२७।। गणेशतीर्थाच्या पश्चिमेस । तीर्थ उत्तम एक सरस । सर्व पुण्यप्रद नाम तयास । क्षेत्रांतीं तें स्थित असे ।।२८।। तीर्थाच्या उत्तर तीरावर । भानुसंज्ञायुक्त तीर्थ थोर । भूषविती दक्षिण तीर । प्रकृति आणि पुरुषपर ।।२९।। तेथ स्नानमात्रें होत । भाविक नर पुण्यवंत । जें जें शुभ वांछीत । तें तें त्यास निश्चित लाभें ।।३०।। सातवें तीर्थ पूर्वेस असत । चतुर्गुण जें प्रमाणांत । या सात तीर्थांत स्नान करित । त्यास सर्व शुभ लाभें ।।३१।। आधीं गणेश तीर्थांत स्नान । नंतर आर्षतीर्थात करून । अघनाशन जें महान । पुण्यदेवीचें तीर्थं नंतर ।।३२।। तदनंतर कापिल तीर्थांत । गाणप तीर्थी पुनः स्नान करित । ऐसा क्रम येथे असत । सांगितला तुम्हां यथामति ।।३३।। ऐसीं मुख्य सात तीर्थें वर्णिलीं । जीं मयूरक्षेत्रीं प्रसिद्ध झालीं । श्रवण करिता माहात्म्य लाभली । पापनाशक शक्ति अनेकांसी ।।३४।। वाचका श्रोत्यांस समस्तांस । ह्या वाचनें पुण्य लाभून खास । सारें दुरित पाप जाय विलयास । विकट देवाच्या कृपेनें ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते सप्ततीर्थवर्णनं नाम षड्विंशतितमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सव्विसांवा संपूर्ण)